वसंतदादा शुगर इन्स्टिट्यूट मांजरी (बु.) ता.हवेली जिल्हा पुणे या संस्थेस सन २०२३-२४ आर्थिक वर्षाकरीता संशोधनासाठी सहाय्यक अनुदान मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ससाका-०७२३ /प्र.क्र २०५ /२५स**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २९ /०८/२०२३

**वाचा -**

१) शासन निर्णय सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.ससाका१००९/प्र.क्र.१३७१/प्र.क्र.१२/ २५- स दि.१७/०६/२००९

२) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र ससाका१००९/प्र.क्र.१२६/ २५-स, दि. १८/०८/२००९

३) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र ससाका २०२० /प्र.क्र.८५/ २५-स, दि.२९/०३/२०२३

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं २०२३/ प्र.क्र.६२/ अर्थ-३ दि.२८/०७/२०२३

५) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र. साआ /अर्थ-६ /कक्ष-६ / व्ही.एस.आय./ अनुदान /१०८५/२०२३ , दि.२८/०७/२०२३.

**प्रस्तावना :**

वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट मांजरी (बु.) ता.हवेली, जिल्हा पुणे या संस्थेस आर्थिक वर्ष २००९-१० पासून दरवर्षी संशोधन सहाय्याची तरतूद किमान रु.५.०० कोटी तसेच गाळप ५०० लाख मे. टनापेक्षा जास्त झाल्यास या तरतूदीत त्यावरील गाळपावर प्रतिटन रु.१/- वाढ करण्याबाबत दि.१७/६/२००९ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. सदरहू शासन निर्णयानुसार वसंतदादा शुगर इन्स्टिट्यूट, जि. पुणे या संस्थेस रु.५.०० कोटी इतकी वार्षिक तरतूद तसेच सन-२०२३-२४ मध्ये पुरवणी मागणी द्वारे रूपये ५५३ लाख इतका निधी असा एकूण १०५३ लाख निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

वर्ष २०२३-२४ मध्ये वसंतदादा शुगर इन्स्टिट्यट मांजरी (बु) ता. हवेली, जिल्हा पुणे या संस्थेस "मागणी क्र.-व्ही-२ मुख्यलेखाशीर्ष - २४२५ - सहकार,- १०८ इतर सहकारी संस्थांना सहायक-(०३) सहकारी साखर कारखाने (०३) (०६) साखर संशोधनासाठी सहायक अनुदान (२४२५ १०४५) -३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशीर्षाअंतर्गत रू.५.०० कोटी अर्थसंकल्पीत तरतूद उपलब्ध आहे.

२. गाळप हंगाम २०२२-२३ मध्ये राज्यात एकूण १०५३.९१ लाख मेट्रीक टन इतके ऊसाचे गाळप झालेले आहे. दि.१७/०६/२००९ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार वार्षिक तरतूद रू ५.०० कोटी तसेच ५०० लाख मेट्रिक टना पेक्षा जास्त गाळप झाल्यास त्यावरील गाळपावर प्रति टन १/- रूपये प्रमाणे अतिरिक्त रक्कम देय आहे. म्हणजेच १०५३.९१ लाख मेट्रीक टन गाळपासाठी रू.१०५३.९१ लाख इतकी रक्कम देय आहे. वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी (बु.), ता. हवेली, जिल्हा- पुणे या संस्थेस "मागणी क्र.-व्ही-२ मुख्यलेखाशीर्ष - २४२५ - सहकार,- १०८ इतर सहकारी संस्थांना सहायक-(०३) सहकारी साखर कारखाने (०३) (०६) साखर संशोधनासाठी सहायक अनुदान (२४२५ १०४५) -३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशीर्षाअंतर्गत पुरवणी मागणी द्वारे रूपये ५५३ लाख मंजूर देण्यात येत आहे.

३. वित्त विभागाच्या दि.१६/०६/२०२३ च्या परिपत्रकान्वये निधी वितरणाबाबत सूचना दिलेल्या आहेत. मात्र वंसतदादा शुगर इन्स्टिटयूट मांजरी (ब्रु) ता. हवेली, जि.पुणे या संस्थेच्या मागणीच्या अनुषंगाने साखर संशोधनासाठी लेखाशिर्ष (२४२५१०४५) ३१ सहायक अनुदाने अंतर्गत पुरवणी मागणी द्वारे रू. ५५३ लाख तसेच सन-२०२३-२४ अर्थसंकल्पीत तरतुद रू.५०० लाख अशी एकूण रू. १०५३ लाख इतका निधी वितरित करण्यास मा. उप मुख्यमंत्री (अर्थ व नियोजन) महोदयांनी विशेष बाब मान्यता दिली आहे. त्यानुसार वंसतदादा शुगर इन्स्टिटयूट मांजरी (ब्रु) ता. हवेली, जि.पुणे या संस्थेच्या मागणीच्या अनुषंगाने रूपये १०.५३ कोटी एकरक्कमी अदा करण्यास शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

४. प्रस्तुत प्रकरणी लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुसार लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांनी वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी बु., ता. हवेली, जिल्हा - पुणे (VASANTDADA SUGAR INSTITUTE, MANJARI (BK.) TALUKA - HAVELI, DISTRICT-PUNE) या संस्थेस अनुदान म्हणून मंजूर केलेली रक्कम रुपये १०.५३ ( अक्षरी रुपये दहा कोटी त्रेप्पन्न लाख फक्त) जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे यांचे कार्यालयामार्फत त्या संस्थेला वितरीत करण्याची कार्यवाही करावी. तसेच सदर रक्कम **"मागणी क्रमांक-व्ही-२ मुख्यलेखाशीर्ष - २४२५ - सहकार,- १०८ इतर सहकारी संस्थांना सहाय्य-(०३) सहकारी साखर कारखाने (०३) (०६) साखर संशोधनासाठी सहाय्यक अनुदान (२४२५ १०४५) -३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)"** या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावी. सदर खर्च सन २०२३-२४ साठी मंजूर झालेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदरहू निधीचा वापर करताना शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक ससाका-१००९/प्र.क्र. २६/२५ स, दि.१८ ऑगस्ट, २००९ अन्वये विहित करण्यात आलेल्या नियम व अटीचे पालन करणे बंधनकारक आहे. तसेच सदर रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र संस्थेने सदर अनुदानाचा संपुर्ण विनियोग केल्यानंतर सनदी लेखा परिक्षकाकडून प्रमाणित करुन हे वित्तीय वर्ष संपल्यानंतर परंतु, पुढील वितरणापूर्वी सादर करावे.

६. या प्रकरणी शासन परिपत्रक वित्त विभाग अर्थसं २०२३/ प्र.क्र.६२/ अर्थ-३ दि.२८/०७/२०२३ सोबतच्या परिशिष्टातील अटींची पूर्ततेच्या अधिन राहून तसेच वित्त विभागाच्या अनौस-क्र.५२१/२०२३/व्यय-२, दि.२२/०८/२०२३ सहमतीनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८२९१३१३५४५००२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINGADE ANKUSH PANDURANG

Digitally signed by SHINGADE ANKUSH PANDURANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, pseudonym=18BA78965A42BF3AA081DE760471DB6306C88F1D, serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=SHINGADE ANKUSH PANDURANG
Date: 2023.08.29 13:15:20 +05'30'

( अंकुश पां. शिंगाडे )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे (३ प्रती)

२) प्रधान महालेखापरिक्षक, लेखापरिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३) लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५) महालेखापाल -१, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) महालेखापाल -२, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९) लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे (३प्रती)
१०) सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
११) वित्त विभाग (व्यय-२), कराधान-३ व अर्थसंकल्प-१२, (अर्थोपाय शाखा)
१२) महासंचालक, वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी (बु.),ता. हवेली, जिल्हा - पुणे.
१३) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.
१४) सहसंचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय इमारत,मंत्रालय, मुंबई.
१५) कक्ष अधिकारी, १६-स तथा वेब को-ऑर्डिनेटर, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती (२५-स).